व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ, यांच्या अध्यक्षतेखाली समिती स्थापन करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण १५२५/प्र.क्र.६०/२१-स,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
विस्तार इमारत, मंत्रालय, मुंबई ४०००३२
दिनांक: २० फेब्रुवारी, २०२५.

**प्रस्तावना:-**

मा.प्रधान सचिव (सहकार व पणन) यांनी दि.१२.०२.२०२५ रोजी घेतलेल्या आढावा बैठकीत पणन संचालनालयाच्या व पणन मंडळाच्या कामकाजाचा आढावा घेतला असता, पणन विषयक काही बाबीमध्ये सुधारणा करण्याची आवश्यकता असल्याचे निदर्शनास आले. त्यासंदर्भात त्यांनी अभ्यास/तपासणी करुन शासनास यथोचित शिफारस करण्यासाठी व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ यांच्या अध्यक्षतेखाली समिती नेमण्याचे निर्देश दिले आहेत. त्यानुसार समिती स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

कृषि उत्पन्न बाजार समितीच्या कामकाजात सुसूत्रता आणण्याच्या दृष्टीने पणन विषयक काही बाबीमध्ये सुधारणा करण्याची आवश्यकता असल्याने, त्यासंदर्भात अभ्यास करुन शासनास योग्य ती उपाययोजना/शिफारस करणेसाठी व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ यांच्या अध्यक्षतेखाली खालीलप्रमाणे समिती स्थापन करण्यास या शासन निर्णयाद्वारे शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

**समितीची रचना:-**

| अ.क्र. | सदस्याचे नाव | पदनाम |
|---|---|---|
| १ | व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ | अध्यक्ष |
| २ | पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे. | सदस्य |
| ३ | कार्यकारी संचालक, महा.राज्य कृषि पणन मंडळ, पुणे. | सदस्य |
| ४ | उपसचिव (पणन) सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय | सदस्य |
| ५ | सहसंचालक (पणन), पणन संचालनालय, पुणे. | सदस्य सचिव |

२. **समितीची कामे:-** सदर समितीने खालील बाबींचा अभ्यास करुन, त्यांच्या अभिप्रायासह ३० दिवसाच्या आत म्हणजेच दि.२०.०३.२०२५ पर्यंत सविस्तर अहवाल शासनास सादर करावा.

१) पणन संचालक यांच्या स्तरावरुन विविध प्रकल्पांसाठी नियुक्त करण्यात येत असलेल्या सल्लागार (consultant) संदर्भात consultation fee प्रकल्प अहवालाच्या किती प्रमाणात असावी, याचे निकष ठरविणे.

२) दि.१९.१२.२०२३ च्या शासन निर्णयाअन्वये अस्तित्वातील शेतकरी भवनाची दुरुस्ती करण्याचे धोरण विहित करण्यात आले आहे. त्यानुसार १९० शेतकरी भवनांच्या दुरुस्ती संदर्भात आराखडा तयार करण्याबाबत बाजार समिती सचिव/अध्यक्ष यांचे मत विचारात घेणे.

३) खाजगी बाजार परवाना नुतनीकरण करणेसंदर्भात धोरण तयार करताना विचारात घ्यावयाच्या बाबी.

४) एकल परवाना फी मध्ये वाढ करताना विचारात घ्यावयाचे निकष ठरविणे/मर्यादा ठरविणे.

५) पणन मंडळाच्या अंशदानातून जमा होणारी रक्कम किती प्रमाणात असावी.

६) सुपरविझन फी मध्ये वाढ करता येईल काय, ही बाब तपासणे.

७) ग्रुप इंन्स्युरन्स स्कीम बाजार समितीमधील कर्मचारी यांना लागू करता येईल काय, ही बाब तपासणे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०२२०१७०९३८१४०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANTOSH DNYANDEO
DESHMUKH

Digitally signed by SANTOSH DNYANDEO DESHMUKH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=CO-OPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT,
2.5.4.20=9652b1a97746d93924d97e059e2acb2aa9b6ef9c2644ab23e6c801f3e656b5ad, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=17757CD30ED5F82FA2A50F777CBE634900B7D3EBCB60660E708648C95D8488B7, cn=SANTOSH DNYANDEO DESHMUKH
Date: 2025.02.20 17:13:10 +05'30'

**( संतोष देशमुख )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. प्रधान सचिव, सहकार व पणन, मंत्रालय, मुंबई
२. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ
३. पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ, पुणे.
५. सहसंचालक (पणन), पणन संचालनालय, पुणे.
६. निवडनस्ती २१ स